निनावी व खोटया तक्रारी, खोटया सहीने केलेल्या तक्रारी याबाबत करावयाची कार्यवाही...

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः शाकाप-२०१५/प्र.क्र. ५ /१८(र. व का.)**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

तारीख: २५ फेब्रूवारी, २०१५

<u>वाचा:</u>- १) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-शाकप-१०८५/५८/१८ (र. व का.) दिनांक ७.५.१९८५

२) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-शाकाप-१०९६/८५०/१८ (र. व का.) दिनांक २७.१२.१९९६

३) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-शाकाप-१०९८/५८/प्र.क्र.५/९८/१८ (र. व का.) दिनांक ३.७.१९९८

४) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-शाकाप-१०.०१/९४८/प्र.क्र.५५/ १८ (र. व का.) दिनांक २९. ७.२००३

**<u>शासन परिपत्रक-</u>**

निनावी व खोटया तक्रारी, खोटया सहीने केलेल्या तक्रारी संदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबतची माहिती संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. केंद्र शासनाने दिनांक १८.१०.२०१३ च्या शासन ज्ञापनान्वये निनावी व खोटया तक्रारी, खोटया सहीने केलेल्या तक्रारी आणि सार्वजनिक हित,प्रसिध्दी व माहिती देणा-यास संरक्षणाबाबतचे आदेश २००४ (PIDPI) यामधील सूचना विचारात घेऊन कशा प्रकारे कार्यवाही करावी याबाबत सूचना निर्गमित केल्या आहेत. सदर सूचनांच्या अनुषंगाने राज्य शासनामार्फत मार्गदर्शक सूचना देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भाधीन शासन परिपत्रके अधिक्रमित करून पुढील प्रमाणे कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्यात येत आहेत.

(१) ज्या तक्रारीमध्ये तक्रारदाराचे नाव व पत्ता नमुद केलेला नाही अशा निनावी तक्रारीमध्ये कोणत्याही स्वरूपाची तक्रार/माहिती अंतर्भूत असली तरी त्यावर कार्यवाही करण्यात येऊ नये. अशा तक्रारी दफ्तरी दाखल करण्यात याव्यात.

(२) ज्या तक्रारीमध्ये असंबध्द (vague) आरोप आहे अशा तक्रारीदेखील तक्रारदाराची तपासणी न करता दफ्तरी दाखल करण्यात याव्यात.

(३) ज्या तक्रारीमध्ये पडताळणी करता येवू शकेल असे आरोप केलेले आहेत अशा तक्रारीचे संबंधात प्रशासकीय विभाग/मंत्रालयाने त्याची दखल घ्यावी. अशा प्रकरणी सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने सदरहू तक्रार तक्रारदाराकडे पाठवून ती त्यांने स्वत: केली आहे काय याबाबत खात्री करून घेण्यात यावी. तक्रारदाराकडून १५ दिवसामध्ये प्रतिसाद मिळाला नाही तर स्मरणपत्र पाठविण्यात यावे व तद्नंतर १५ दिवसांची प्रतिक्षा केल्यानंतर देखील माहिती प्राप्त न झाल्यास सदरहू तक्रार खोटया नावाची (Pseudonymous) तक्रार असल्याचे नमुद करून दफ्तरी दाखल करण्यात यावी.

(४) तक्रारदाराने आपण स्वत: तक्रार केल्याचे मान्य केल्यास अशा तक्रारीवर कार्यवाही करताना तक्रार अर्जातील अर्जदाराचे नाव व पत्ता झाकुन तक्रारीची छायांकित प्रत काढुन ती चौकशीसाठी संबंधित यंत्रणेकडे पाठवावी व पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५१५०१४१३१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prem Singh Meena

Digitally signed by Prem Singh Meena
DN: c=IN, o=all india services, ou=IAS, postalCode=110003, st=New Delhi, cn=Prem Singh Meena
Date: 2015.02.25 15:36:45 +05'30'

**(डॉ. पी. एस. मीना)**
अपर मुख्य सचिव (प्र.सु. र. व का.)

प्रत,

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व विधानमंडळ/संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य
३. मा. राज्यपालांचे सचिव
४. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
५. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
६. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक,
७. शासनाचे मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१०. सर्व मंत्रालयीन विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त सुचना त्यांनी त्यांच्या सर्व क्षेत्रिय कार्यालयांच्या निर्दशनास आणाव्यात.
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१२. सर्व विभागीय आयुक्त,
१३. सर्व जिल्हाधिकारी,
१४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१६. निवड नस्ती (कार्यासन १८)